कृषि विभागाच्या “महाराष्ट्र पौष्टिक तृणधान्य” अभियानांतर्गत श्रीअन्न (Millets) अभियानाच्या प्रचार व प्रसिध्दीसाठी प्रशासकीय मंजूरी देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पौतृव-२०२३/प्र.क्र.१६/४-अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०००३२

दिनांक : ०७ मार्च, २०२४.

वाचा -

१) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्र.भांखस-२०२४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दि.०१.१२.२०१६.

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मावज-२०२१/प्र.क्र.१२६/का-३४, दि.१३.०८.२०२१

३) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र.पौतृव-२०२३/प्र.क्र.१६/४अे, दि.०६.०२.२०२३

४) शासन परिपत्रक, कृषि व पदुम विभाग क्र.मश्रीअ-२०२३/प्र.क्र.३५/४अे, दि.१७.०४.२०२३

५) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.३८/३-अे, दि.२०.१०.२०२३

६) कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण),कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य पुणे यांचे पत्र क्र.कृमावि/विप्र-४/मिलट मि./६०८०/२०२४, दि. २३.०२.२०२४

प्रस्तावना -

राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत “महाराष्ट्र पौष्टिक तृणधान्य” अभियानास दि.०६.०२.२०२३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यामध्ये प्रचार व प्रसिध्दी या बाबीचा समावेश आहे.

सामान्य प्रशासन विभागाच्या दि. १३.०८.२०२१ च्या शासन निर्णयानुसार शासकीय जाहिराती वितरण धोरणाच्या अंमलबजावणीची कार्यपद्धती विहित करण्यात आली आहे. त्यानुसार सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये कृषि विभागाच्या विविध योजना इ. च्या प्रचार व प्रसिध्दीसाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या माध्यम आराखडा नियोजन व अंमलबजावणी समितीच्या दि.२१.०९.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत मंजूरी देण्यात आलेल्या माध्यम आराखड्यास तसेच तो राबविण्यासाठी रु.१३,९९,९७,९५०/- इतक्या खर्चास संदर्भाधीन क्र.४ येथील दि.२०.१०.२०२३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णय दि.०१.१२.२०१६ मधील मुद्दा क्र. ३.३.२(अ) नुसार “पूर्वी दिलेल्या आदेशाच्या संदर्भात पुनर्प्रत्ययी आदेश, सुरवातीचा आदेश दिल्यानंतर सहा महिन्यांच्या कालावधीच्या पूर्वी देता येईन. पुनर्प्रत्ययी आदेश फक्त एकदाच देता येईल आणि त्याचे मुल्य आणि संख्या सुरुवातीच्या आदेशाच्या ५० टक्के किंवा रु.१० कोटी यापैकी जे कमी असेल, त्यापर्यंतची खरेदी करता येईल.” अशी तरतूद आहे.

कृषि विभागामार्फत आंतरराष्ट्रीय पौष्टिक तृणधान्य वर्षाच्या निमित्ताने राबविण्यात येणाऱ्या महाराष्ट्र **श्रीअन्न** (Millets) मिशन २०२३-२४ योजनेच्या प्रसिध्दीकरिता रु.२.३६ कोटी इतक्या रकमेचा सध्या सुरु असलेल्या प्रचार व प्रसिध्दीसाठीच्या माध्यम आराखड्यात अंतर्भाव करण्याबाबत कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांचे दि.२३.०२.२०२४ च्या पत्रान्वये विनंती करण्यात आलेली आहे. त्यानुसार, सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने पुनर्प्रत्ययी आदेशास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय</u> :**

उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि.०१.१२.२०१६ च्या शासन निर्णयातील मुद्दा क्र.३.३.२ मधील तरतूदीनुसार या विभागाने दि.२०.१०.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या माध्यम आराखड्याच्या मंजूरीच्या अनुषंगाने, श्रीअन्न (Millets) अभियानाच्या प्रचार व प्रसिध्दीकरिता रु.२,३६,००,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी छत्तीस लाख फक्त) च्या खालील बाबींबाबत पुनर्प्रत्ययी आदेश देण्यास व सदर बाबीवरील खर्चास दिनांक ०६ फेब्रुवारी, २०२३ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आल्यानुसार, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **बाब** | **प्रस्तावित तरतूद (रु.लाखात)** |
|---|---|---|
| १. | महाराष्ट्रातील जिल्हा व तालुका स्तरावरील एसटी बस स्थानकांवर इलेक्ट्रॉनिक साईन बोर्ड/एलईडी स्क्रीन/इलेक्ट्रॉनिक मिडिया ॲडव्हर्टायझिंग | ८८.०० |
| २. | Social Media campaign for Facebook, Twitter, Koo app and other social creative and paid posting | ७४.०० |
| ३. | Digital Platform Campaign | ७४.०० |
| | **एकूण** | **२३६.००** |

२. सदर प्रचार व प्रसिध्दी कार्यक्रम राबिवण्यासाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना कार्यक्रमाचे कार्यान्वयन तसेच संनियंत्रण करण्यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यानुषंगाने संबंधित देयके संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांच्या कार्यालयाकडे थेट सादर करण्यात यावीत. संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी प्रस्तुत कार्यक्रम राबविण्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

३. संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी निधी विनियोगाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास वेळोवेळी सादर करण्याची कार्यवाही करावी.

४. प्रस्तुत प्रचार व प्रसिध्दी कार्यक्रम राबविण्यासाठी खर्च करतांना शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/आदेश/परिपत्रकांमधील तरतूदींचे तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील तरतूदींचे/अटी व शर्तीचे पालन करुन तसेच खरेदी प्रक्रियेबाबत विहीत तरतूदींचे व कार्यपध्दतीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

५. सदर शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि.०१.१२.२०१६ च्या शासन निर्णयातील मुद्दा क्र.३.३.२ मधील तरतूदीनुसार तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-

१०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७/०४/२०१५ अन्वये निर्गमित केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उप विभाग-चार मधील अ.क्र.११ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३०७१२२४३१६६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH BANSIRAO KARAD

Digitally signed by SANTOSH BANSIRAO KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=f981d5a9fec2e5d5dc36f39695b5f0e4ff5b340cd5420df7cb aa28990d692e36, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=90BBB9D3E7E74DE43F8070E2A9A65BFD42747F1995 A4F22FDC0240939AAB0835, cn=SANTOSH BANSIRAO KARAD
Date: 2024.03.07 12:33:48 +05'30'

**( संतोष कराड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति -**

१) मा.मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२
३) मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२
४) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
५) अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६) अपर मुख्य सचिव (वित्त), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) प्रधान सचिव (नियोजन), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२
९) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे
१०) संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे
११) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१२) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१३) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
१४) महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई
१५) महालेखापाल - १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
१६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१७) वित्त विभाग (कार्या.व्यय-१) (अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई-३२
१८) कार्यासन अधिकारी, २अे/१४-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) निवड नस्ती (कार्यासन-४अे)

****